आदिवासी विकास विभागांतर्गत कार्यरत शासकीय आश्रमशाळांतील विद्यार्थ्यांसाठी भाजीपाला, मटन, चिकन, फिश, अंडी, केळी इ. ची खरेदी तसेच शासकीय वसतीगृहासाठीचे भोजन ठेके यासंदर्भातील एकसमान ई-निविदा प्रक्रिया राबविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाआशा- २०२०/ प्र.क्र. ११७/का-१३,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.
तारीख: २ मार्च, २०२३.

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय क्रमांकः आदिवासी विकास विभाग, क्र. शाआशा-२०१३/प्र.क्र.३४८/का-१३, दिनांक १६.०९.२०१३.
२) शासन निर्णय क्रमांकः उद्योग,उर्जा व कामगार विभाग,क्र.भांखसं-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग- ४, दि.१.१२.२०१६
३) शासन निर्णय क्रमांकः नियोजन विभाग, क्र.डिसीटी २३१६/प्र.क्र.१३३/का-१४१७, दि.५.१२.२०१६
४) शासन निर्णय आदिवासी विकास विभाग, क्र.शाआशा-२०१७/प्र.क्र.३४१(भाग-१)/का-१३, दिनांक २९.०४.२०१७.
५) शासन निर्णय आदिवासी विकास विभाग, क्र.शाआशा-२०१७/प्र.क्र.३४१(भाग-१)/का-१३, दिनांक २.५.२०१७.
६) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग, क्र.शाआशा-२०१५/प्र.क्र.३४१(भाग-१)/का-१३, दिनांक १५.०६.२०१७.
७) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग, क्र.शाआशा-२०२०/प्र.क्र.११७)/का-१३-अ, दिनांक ३० डिसेंबर, २०२०
८) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीसीएच-२०२०/ प्र.क्र.२५-क/शिक्षण-२, दिनांक २९ नाव्हेंबर, २०२१
९) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीसीएच-२०२५/प्र.क्र.१४८/ शिक्षण-२, दिनांक २० सप्टेंबर, २०१७
१०) आदिवासी विकास विभाग, पत्र क्रमांक: बैठक-२०२२/प्र.क्र.२७/का.१६, दिनांक १९ मे, २०२२.
११) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.शाआशा-शावगृ-पुरवठा-२०२२/प्र.क्र.३६/ का-६(८)/६४१, दिनांक २४ जानेवारी, २०२३

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागांतर्गत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांसाठी राज्यात सध्या ४९७ शासकीय आश्रमशाळा आहेत. प्रस्तुत शासकीय आश्रमशाळांतील विद्यार्थ्यांना संदर्भ क्र. ७ येथील दिनांक ३० डिसेंबर, २०२० रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक २ येथील शासकीय वसतीगृहासाठी भोजन ठेके तसेच शासकीय आश्रमशाळांसाठी, प्रकल्प अधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समिती क्रमांक (२) मार्फत भाजीपाला, मटन, चिकन, फिश, अंडी व केळी इत्यादींची खरेदी प्रकल्प स्तरावर शाळानिहाय /वसतीगृहनिहाय निविदा प्रक्रिया राबवून करण्यात येत आहे. सदर निविदेमध्ये एका पेक्षा जास्त पुरवठाधारक असतात, अशावेळी निकृष्ठ साहित्य पुरवठाधारकांवर जबाबदारी निश्चित करणे शक्य होत नाही व दरांमध्ये देखील मोठया प्रमाणात तफावत दिसून येत असल्याचे शासनास निदर्शनास आले. त्यामुळे निविदा प्रक्रिया मंजूर करताना एकवाक्यता, सुसूत्रता व एकसमान दर राहण्याकरिता सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या संदर्भ क्र. ८ येथील शासन निर्णयाच्या धर्तीवर आदिवासी विकास विभागांतर्गत शासकीय वसतीगृहासाठी भोजन ठेके तसेच शासकीय आश्रमशाळांसाठी भाजीपाला, मटन, चिकन, फिश, अंडी व केळी इत्यादींची खरेदी करण्यासंदर्भातील धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केलेली पार्श्वभूमी विचारात घेता, आदिवासी विकास विभागांतर्गत शासकीय वसतीगृहासाठी भोजन ठेके तसेच शासकीय आश्रमशाळांसाठी भाजीपाला, मटन, चिकन, फिश, अंडी व केळींचा पुरवठा करण्यासाठी सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षापासून खालीलप्रमाणे कार्यपध्दती अवलंबविण्यात यावी.

१) आदिवासी विकास विभागांतर्गत शासकीय वसतीगृहासाठी भोजन ठेके तसेच शासकीय आश्रमशाळांसाठी भाजीपाला, मटन, चिकन, फिश, अंडी, केळींचा पुरवठा करण्यासाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या अध्यक्षतेखालील समितीमार्फत त्यांच्या स्तरावरुन प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कार्यालयांतर्गत असलेल्या सर्व आश्रमशाळांकरिता एकच प्रकल्प निहाय एकसमान ई-निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी सर्व आश्रमशाळांच्या ई-निविदा एकाच दिवशी प्रकल्प निहाय प्रसिध्द कराव्यात.

३) उदयोग, उर्जा व कामागार विभागाच्या दिनांक १.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ५.१४ च्या व्याप्तीमध्ये सेवा, स्थापत्य किंवा वाहतूक या बाबी राखीव नसल्या तरी अनुसूचित जाती /जमातीच्या निविदा धारकांना प्रतिनिधीत्व मिळावे म्हणून मा. उच्च न्यायालयाने याचिका क्र. १६/२०१६ मध्ये दिलेला निर्णय विचारात घेऊन व परिच्छेद क्र. ५.१४ च्या धर्तीवर एकूण ४% शासकीय आश्रमशाळा /वसतीगृहे अनुसूचित जमातींच्या निविदाधारकांसाठी आरक्षित ठेवण्यात येत आहेत.

४) सदर निविदा प्रक्रिया राबविण्यासाठी आयुक्त ( मुख्यालय), आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.:-

| | | |
|---|---|---|
| १.आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक | : | अध्यक्ष |
| २.अपर आयुक्त (मुख्यालय), आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक | : | उपाध्यक्ष |
| ३.अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे | : | सदस्य |
| ४.अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक | : | सदस्य |
| ५.अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर | : | सदस्य |
| ६.अपर आयुक्त, आदिवासी विकास, अमरावती | : | सदस्य |
| ७.सह आयुक्त (शिक्षण), आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक | : | सदस्य |
| ८.उप संचालक (अर्थ व लेखा) आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक | : | सदस्य |
| ९.उप आयुक्त (शिक्षण) आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक | : | सदस्य सदस्य |

५. उक्त समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल.

अ) प्रकल्पनिहाय आधारभूत किंमत ठरविणे.

आ) निविदापूर्व बैठका घेणे, निविदाधारकांच्या शंकाचे निरसन करणे.

इ) निविदेची जाहिरात प्रसिध्द करणे.

ई) विहित दिनांकास तांत्रिक लिफाफे उघडून त्यांचे वाचन उपस्थित निविदाधारकांसमोर करणे.

६. शासनाचे प्रचलित नियम, निविदेतील अटी व शर्ती आणि उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय, दिनाक ०१.१२.२०१६ मधील सर्व तरतुदींचे पालन काटेकोरपणे करणे.

७. उक्त समिती स्थापन केल्यामुळे संदर्भ क्र. ७ येथील दिनांक ३० डिसेंबर, २०२० रोजीच्या शासन निर्णयातील अ.क्र. ९ येथील भाजीपाला व मटन/चिकन/फिश/अंडी/केळी इ. पुरवठयासंदर्भातील तरतूद रद्द करण्यात येत आहे.

८. सदरची आधारभूत किंमत या शासन निर्णयान्वये स्थापन केलेल्या उक्त परिच्छेद क्र. ४ मध्ये नमूद समितीने निश्चित करुन ती सिलबंद लिफाफ्यात ठेवावी व आर्थिक लिफाफा उघडल्यानंतर आधारभूत किंमतीचा लिफाफा उघडून पात्र निविदाधारकांना वाचून दाखववावा.

९. निविदाधारकाने असमर्थता दर्शविल्यास त्यांची निविदा रद्द करण्यात यावी.

१०.एका प्रकल्पाअंतर्गत असलेल्या सर्व शासकीय वसतीगृहे / आश्रमशाळांसाठीचे दर कोणत्याही परिस्थितीत एकच राहतील याची काळजी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी घ्यावी.

११.अनुसूचित जमातीच्या निविदाधारकांसाठी आरक्षित ठेवलेल्या आश्रमशाळां / वसतीगृहांकरिता वेगळी निविदा काढण्यात येऊ नये.

१२.अनुसूचित जमातीचे निविदाधारका यांनी निविदा प्रक्रियेत सहभाग घेतांना ते तांत्रिकदृष्टया निविदेतील अटी व शर्ती पूर्ण करणारे पात्र निविदाधारक असणे अनिवार्य आहे.

१३.निविदेतील पुरवठा कालावधी १ शैक्षणिक वर्षासाठी राहील व मंजूर दर हे एका वर्षासाठी लागू राहतील, यामध्ये कोणतीही मुदतवाढ दिली जाणार नाही.

१४.अनुसूचित जमातीच्या निविदाधारकांनी प्रकल्प स्तरावरील मान्य निविदेतील न्युनतम दराने पुरवठा करणे बंधनकारक असेल.

१५.निविदाधारक यांनी खालील बाबींची पुर्तता करणे बंधनकारक असेल.

१६.पुरवठाधारक अंतिम झाल्यानंतर प्रकल्प अधिकारी यांच्या मागणीप्रमाणे पुरवठाधारकाने साहित्यांचा पुरवठा करणे बंधनकारक राहील.

i) सर्व साहित्यांचा पुरवठा झाल्याची खातरजमा करुन प्रकल्प अधिकारी यांनी पुरवठाधारकांची देयके त्यांच्या स्तरावर अदा करावीत.

ii) सुक्ष्म व लघु उद्योग या श्रेणीतील निविदा भरणाऱ्या निविदाधारकांना सुक्ष्म व लघु उद्योग उपक्रमांची नोंदणी http://udyogaadhar.gov.in या पोर्टलवर करणे बंधनकारक असेल.

iii) सुक्ष्म व लघु उद्योजक संस्था / बचतगट /सहकारी संस्था/ विश्वस्त संस्था यांना अनुसूचित जमातीच्या राखीव कोटयातून निविदा भरावयाची असल्यास १००% सभासद हे अनूसूचित जमातीचे असणे बंधनकारक असेल. यापृष्ठयर्थ सर्व सभासदांचे जात वैधता प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक असेल.

iv) बचत गट/सहकारी संस्था/ उद्योग हे सक्षम प्राधिकाऱ्यांनी मान्यता दिलेल्या व नोंदणीकृत संस्था असणे आवश्यक आहे.

१७.निविदा प्रक्रियेमध्ये एकाही अनुसूचित जमाती संस्था / व्यक्तीने भाग घेतला नसेल किंवा एकही अनूसूचित जमातीची संस्था /व्यक्ती निविदाधारक पात्र ठरत नसेल अशा प्रकरणी अनुसूचित जमातीच्या निविदाधारकांसाठी राखीव ठेवलेल्या ४% शासकीय आश्रमशाळा /वसतीगृहे आपोआप अराखीव होतील.

१८. अनुसूचित जमातीकरीता राखीव असलेल्या शासकीय आश्रमशाळा/ वसतिगृहांमध्ये भाग घेतलेल्या पात्र निविदा धारकांपैकी एका पेक्षा जास्त निविदाधारकांचे दर समान /एकच असतील अशा प्रसंगी खालील प्राधान्याने त्यांची निवड करावी

१) अनुसूचित जमाती महिला /पुरुष सहकारी संस्था

२) अनुसूचित जमाती महिला /पुरुष बेरोजगार संस्था

३) अनुसूचित जमाती महिला बचत गट

४) अनुसूचित जमातीतील हॉटेल मॅनेजमेंट आणि कॅटरींग टेक्नॉलॉजी मधील पदवी/पदविका प्राप्त महिला / पुरुष.

५) अनुसूचित जमाती महिला / पुरुष पुरवठादार संस्था.

६) अनुसूचित जमाती महिला / पुरुष.

१९. प्रसिध्द केलेली निविदा रद्द करणे, त्यात बदल करणे याबाबतचे अधिकार आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना शासनाच्या पुर्वपरवानगीने असतील. तसेच याबाबत काही वाद निर्माण झाल्यास त्याबाबतचे अपिल मा. मंत्री ( आदिवासी विकास) यांच्याकडे करता येईल.

२०. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयातील तरतूदीप्रमाणे वित्तीय प्राधिकारानुसार ई-निविदा प्रक्रियेस अंतिम मान्यता घेण्याची कार्यवाही करावी.

२१. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या समितीमार्फत राबविण्यात येणाऱ्या प्रकल्प निहाय ई-निविदा प्रारुपास आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी शासनाची मान्यता घ्यावी.

२२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२७१३०१२५८९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c4f0e8608020fad0064f5bd3c615be5666dc0af54fcf5038cc18559d51a472ba, pseudonym=DDE30B7B971C12AC5E78F6BE2C672CA11B7A98CE, serialNumber=2182F4F20DAA6841AB430B2FD812E7B5D3A883E72EFA574CA5E29FF528BC8015, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2023.03.02 19:02:05 +05'30'

**(वि.फ.वसावे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.४०० ०३२.
३. मा.मंत्री ( आदिवासी विकास ), मंत्रालय, मुंबई :- ४०० ०३२.
४. सर्व मा. मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. सर्व मा. विधानसभा सदस्य.
८. सर्व मा. विधानपरिषद सदस्य.
९. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१३. निबंधक, उच्च न्यायालय, मुंबई, / खंडपीठ नागपूर / खंडपीठ औरंगाबाद.
१४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
१५. सर्व जिल्हाधिकारी.
१६. सरकारी अभियोक्ता, उच्च न्यायालय, मुंबई / नागपूर / औरंगाबाद.

१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक
१८. अपर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नागपूर / नाशिक/ ठाणे / अमरावती.
१९. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२०. शिक्षण संचालक, (उच्च शिक्षण ) महाराष्ट्र राज्य, पुणे.
२१. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
२२. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
२३. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२६. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२७. सर्व उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
२८. उप सचिव ( व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२९. सर्व मुख्याध्यापक, शासकिय आश्रमशाळा
३०. सर्व गृहप्रमुख /गृहपाल, शासकिय वसतीगृहे
३०. निवडनस्ती (का-१३ ) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.